**शासकीय जमिनीवरील अतिक्रमण**
**प्रतिबंध, निष्काषित करणे, फिर्याद दाखल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन परिपत्रक क्रमांक जमीन ०३/२००९/प्र.क्र.१३/ज-१
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१०

**शासन परिपत्रक :-**

शासकीय जमिनीवरील अतिक्रमणास प्रतिबंध करणे व झालेली अतिक्रमणे तात्काळ निष्काषित करण्याबाबत वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. मात्र अद्यापही क्षेत्रीय स्तरावर त्यानुषंगाने गांभीर्यपूर्वक कार्यवाही होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे, शासकीय जमिनी अतिक्रमण करुन बळकाविण्यात येत आहेत. काही प्रसंगी अतिक्रमणास शासकीय जमिनीच्या लगतच्या व्यक्ती / स्थानिक लोकांकडून विरोध होतो. अशा वेळेस अतिक्रमण करणाऱ्या व्यक्तींकडून विरोध मोडून काढण्यासाठी बळाचा वापर केला जातो. अशा प्रकारे अतिक्रमणास स्थानिक लोकांनी विरोध केल्यास कायदा व सुव्यवस्थेची स्थिती बिघडते. मात्र जमिनीच्या मालकी हक्काच्या अनुषंगाने सरकारी यंत्रणेकडून फिर्याद न दाखल केल्यामुळे पोलिसांना परिणामकारक कार्यवाही करता येत नाही, असा अहवाल गृह विभागाने सादर केला आहे. वरील वस्तुस्थिती विचारात घेता पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.:-

(१) ग्रामीण / नागरी भागातील शासकीय, पड, गायरान जमिनीची तसेच संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेच्या ताब्यात असलेल्या मोकळया / सार्वजनिक जागांची नकाशासह सूची तयार करुन ती स्थानिक महसूल कार्यालयात, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यालयात ठळकपणे लावण्यात यावी. त्यासोबत शासकीय जमिनीवर अतिक्रमण केल्यास कायदेशिर कारवाई चा इशारा देण्यात यावा.

(२) शासकीय, पड, गायरान जमिनीवर किंवा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सार्वजनिक, मोकळया जागेवर अतिक्रमण झाल्याचे निदर्शनास आल्यास सदर अतिक्रमण तात्काळ निष्काषित करण्याची कार्यवाही करावी.

(३) शासकीय जमिनीवरील अतिक्रमणास प्रतिबंध करणे ही सदर जमीन ज्या विभागाच्या ताब्यात आहे त्या विभागाची जबाबदारी आहे. त्यामुळे शासकीय जमिनीच्या बाबतीत संबंधित तलाठी / मंडळ अधिकारी, वन जमिनीच्या बाबतीत स्थानिक वन अधिकारी, गायरान व सार्वजनिक जमिनीच्या बाबतीत संबंधित ग्रामसेवक, नगरपालिकेचे मुख्याधिकारी आणि अन्य प्रकरणात शासकीय जमीन ज्या विभागाच्या ताब्यात आहे त्या

विभागाचा/ संस्थेचा स्थानिक अधिकारी यांनी तात्काळ पोलिसात फिर्याद देण्याची दक्षता घ्यावी. फिर्याद दाखल करण्याची जबाबदारी एकमेकावर ढकल्यास वरिष्ठांनी संबंधितांविरुध्द जबाबदारी निश्चित करुन कारवाई करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०९१४०४३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-

**(राजेंद्र सुर्वे)**
**सह सचिव,**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :**

ग्रामविकास विभाग, मंत्रायल, मुंबई - ३२
सर्व विभागीय आयुक्त
जमाबंदी आयुक्त व संचालक,भूमि अभिलेख,महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व जिल्हाधिकारी / अपर जिल्हाधिकारी.
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य (१)मुंबई.
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य (२) नागपूर
"ज" समुहातील सर्व कार्यासने / उपसचिव / सहसचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई..
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
१० प्रतींसह विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई-३२,
५ प्रतींसह माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व राजकीय पक्षाची मध्यवर्ती कार्यालये यांना प्रत्येकी ५/५ प्रती
कार्यासन ज-१, महसूल व वन विभाग निवडनस्ती.